“कांदा बाजारभावातील घसरण व उपाययोजना”
यासाठी समिती गठित करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय,क्रमांक:- सपस-२०२३/प्र.क्र.५२/२४ स**
मंत्रालय, विस्तार, मुंबई-३२
दिनांक:- २८ फेब्रुवारी,२०२३

**प्रस्तावना:-**

भारतामध्ये कांद्याच्या उत्पादनात महाराष्ट्र अग्रेसर असुन देशाच्या उत्पन्नामध्ये जवळपास ३०% हिस्सा राज्याचा आहे. राज्यामध्ये कांद्याचे उत्पादन खरीप, लेट खरीप व रब्बी या तीनही हंगामात घेतले जाते.

कांदा हा नाशवंत असल्याने कांद्याला किमान आधारभूत किंमत लागू करता येत नाही. महाराष्ट्रातील कांदा हे महत्वाचे नगदी पिक असून त्याला मिळणारा भाव हा कांदा उत्पादक शेतक-यांच्या दृष्टीने अत्यंत संवेदनशील व जिव्हाळ्याचा भाग आहे. देशातील कांदा उत्पादन, त्याची देशांतर्गत मागणी व देशातून होणारी निर्यात इ. बाबींचा परिणाम बाजारपेठेतील कांद्याच्या दरावर होत असतो.

काही वर्षापूर्वी लेट खरीप कांद्याचे उत्पादन महाराष्ट्र, कर्नाटक व उत्तरप्रदेश या राज्यातून घेतले जात होते. तथापि, २-३ वर्षापासून मध्यप्रदेश,राजस्थान,गुजरात आणि पश्चिम बंगालसह अन्य राज्यांमध्ये लेट खरीप कांद्याचे उत्पादन घेणे सुरू केले आहे. सदर राज्यातून कमी वाहतूक खर्चात उत्तर भारतातील बाजारपेठेत कमी कालावधीत कांदा उपलब्ध होत असल्याने महाराष्ट्रातील कांद्याचा कमी उठाव होत आहे. सध्या बाजारात लेट खरीप हंगामातील लाल कांद्याची आवक मोठया प्रमाणात सुरू आहे. लाल कांद्याची साठवणूक क्षमता कमी असल्याने सदर कांद्याला परदेशातून कमी मागणी आहे. तसेच ग्राहकांकडून आवश्यकतेनुसार कांद्याची खरेदी केली जात असल्याने पुरवठयाच्या प्रमाणात मागणी कमी आहे. परिणामी कांद्याच्या दरात घसरण झालेली आहे. जानेवारी महिन्यात कांद्याला मिळणाऱ्या बाजारभावात रूपये ७०० ते ८०० रुपयांची घट होऊन सध्या रुपये ४५० ते ६०० प्रति क्विंटल भाव कांद्याला मिळत आहे.

लेट खरीप हंगामातील लाल कांदा ओलसर व आकाराने लहान असल्याने तसेच कांद्याची प्रत खराब झाल्याने सदर कांद्याला कमी भाव मिळत आहे. त्यामुळे शेतकऱ्यांमध्ये नाराजी पसरली असून वर्तमानपत्रात बातम्या प्रसिध्द होत आहेत. उदा.सोलापूर कृषी उत्पन्न बाजार समितीमध्ये “दहा पोती कांदा विकल्यानंतर शेतकऱ्यांस २ रुपयाचा चेक” व अशा पध्दतीने प्रसिध्द झालेल्या अन्य बातम्या.

राज्यात कांद्याच्या बाजारभावात झालेली घसरण आणि विविध शेतकरी संघटना आणि शेतकऱ्यांकडून होणारी अनुदानाची मागणी लक्षात घेता “कांदा बाजारभावातील घसरण व उपाययोजना” यासाठी समिती गठित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

राज्यात कांद्याच्या बाजारभावात झालेली घसरण आणि विविध शेतकरी संघटना आणि शेतकऱ्यांकडून होणारी अनुदानाची मागणी लक्षात घेता "कांदा बाजारभावातील घसरण व उपाययोजना" यांचा अभ्यास करुन योग्य त्या योजनांची शासनास शिफारस करण्यासाठी डॉ.सुनिल पवार, माजी पणन संचालक यांच्या अध्यक्षतेखाली पुढीलप्रमाणे समिती गठित करण्यात येत आहे:-

I. डॉ.सुनिल पवार, माजी पणन संचालक - अध्यक्ष
II. पणन संचालक, महाराष्ट्र राज्य,पुणे (श्री. विनायक कोकरे) - सदस्य
III. उप सरव्यवस्थापक, कृषी पणन मंडळ,पुणे (श्री. भास्कर पाटील) - सदस्य
IV. जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था नाशिक (श्री. सतिश खरे ) - सदस्य
V. जिल्हा कृषी अधिकारी,नाशिक (श्री. विवेक सोनावणे) - सदस्य
VI. उपसरव्यवस्थापक (नाशिक विभाग) कृषी पणन मंडळ,पुणे (श्री.चंद्रशेखर बारी) - सदस्य सचिव

२. उपरोक्त समिती खालील विषयांचा सखोल अभ्यास करुन, कांदा उत्पादक शेतकऱ्यांसाठी योग्य त्या उपाययोजनांची शिफारस करेल:-

- कांदा दर घसरणीबाबत सध्या उद्भवलेल्या परिस्थितीची कारणमीमांसा
- १ डिसेंबर २०२२ ते २८ फेब्रुवारी,२०२३ या कालावधीतील कांद्याची आवक व दर
- देशातील प्रमुख कांदा उत्पादक राज्ये व त्या राज्यातील ( १ डिसेंबर २०२२ ते २८ फेब्रुवारी,२०२३ या कालावधीतील )कांदा आवक व दरस्थिती आणि त्याचा महाराष्ट्रातील कांदा बाजारभावावर होणारा परिणाम
- कांदा घसरणीबाबत शेतकरी व शेतकरी संघटना यांच्याकडून प्राप्त तक्रारींच्या अनुषंगाने उपाययोजना
- देशांतर्गत कांदा वाहतूक अनुदान योजना
- कांदा निर्यातीसाठी विविध उपाययोजना

३. सदर समिती आपला अहवाल ८ दिवसात शासनास सादर करेल.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा २०२३०२२८१५४३४५५१०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUGRIV SAMBHAJI DHAPATE

Digitally signed by SUGRIV SAMBHAJI DHAPATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT,
2.5.4.20=d02297f9b5e889636956e39bfae4ea112e908c0e9a7e572d4190f9709a817f51, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=FC102DE27DC1B41E747AC6CBB491C4209459C3CF340720EA98FD1D95B19C9F65, cn=SUGRIV SAMBHAJI DHAPATE
Date: 2023.02.28 15:48:25 +05'30'

**(डॉ. सुग्रीव धपाटे)**
**सहसचिव (पणन), महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

I. मा. मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई

II. मा. मंत्री (पणन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई

III. मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई

IV. अप्पर मुख्य सचिव (वित्त) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई

V. प्रधान सचिव (कृषी), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई

VI. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे

VII. आयुक्त (कृषी), कृषी आयुक्तालय, पुणे

VIII. सहसचिव/उपसचिव (पणन), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग

IX. पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे

X. डॉ.सुनिल पवार, माजी पणन संचालक

XI. श्री. भास्कर पाटील, उप सरव्यवस्थापक, कृषी पणन मंडळ,पुणे

XII. श्री. सतिश खरे, जिल्हा उपनिबंधक,सहकारी संस्था, नाशिक

XIII. श्री. विवेक सोनावणे, जिल्हा कृषी अधिकारी,नाशिक

XIV. श्री.चंद्रशेखर बारी,उपसरव्यवस्थापक (नाशिक विभाग) कृषी पणन मंडळ,पुणे

XV. निवड नस्ती २४ स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.